मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेत मंजुर असलेल्या कामांच्या ई-निविदा प्रसिद्धीबाबत सूचना...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२४/प्र.क्र.२०५/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: १३ मार्च २०२४

वाचा :

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८.१०.२०१५.**
२) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः निविदा-२०१२/प्र.क्र.९७/पंरा-७, दिनांक २३.१०.२०१३.**
३) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः निविदा-२०१६/प्र.क्र.१९५/पंरा-७, दिनांक २६.०७.२०१६.**
४) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः निविदा-२०२१/प्र.क्र.१३/बांध-४, दिनांक ३१.०८.२०२३.**
५) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः मुग्रायो-२०२१/प्र.क्र.१६५/बांध-४, दिनांक ०६.०१.२०२२.**
६) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः मुग्रायो-२०२३/प्र.क्र.४३६/बांध-४, दिनांक १५.०२.२०२४.**

**प्रस्तावना :**

मुख्यमंत्री ग्राम सडक योजनेतर्गत राज्यातील ग्रामीण रस्ते व इतर रस्ते यांची दर्जोन्नती करण्यासाठी वाचा क्र. ०१,०५,व ०६ येथील शासन निर्णयान्वये ४७,००० कि.मी. लांबीच्या दर्जोन्नतीसाठी मान्यता देण्यात आलेली आहे. सदरहू विकासात्मक कामे व विकास कामांसाठी दि.०१.०१.२०१२ पासून ई-निविदा कार्यप्रणालीचा अवलंब केला आहे.त्यानुषंगाने ई-निविदा प्रणाली अंतर्गत सुधारीत कार्यपध्दती व निविदा सुचनेचा कालावधी विहित करण्यात आला होता. रस्ते वाहतूक सुरक्षित व सुरळित होण्यासाठी रस्त्यांची कामे तातडीने कार्यान्वीत होणे निकडीचे होते याआधारावर विभागाच्या वाचा क्र. ०३ येथील शासन निर्णयान्वये कालावधी निश्चित करण्यात आलेला आहे. मात्र सन २०२३-२४ या वर्षात शहरी स्थानिक स्वराज्य संस्था/ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्था तसेच लोकसभा निवडणुका प्रस्तावित आहे.सदरहू निवडणूकांच्या आचारसंहिता कालावधी मध्ये विकास कामांना विलंब होऊ नये तसेच मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत मंजूर असलेली विकास कामांना विहित मुदतीत कार्यारंभ आदेश देणे आवश्यक असल्याने ई-निविदा प्रसिद्धीचा कालावधीमध्ये मर्यादित स्वरूपात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०२३-२४ या वर्षात शहरी स्थानिक स्वराज्य संस्था/ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्था तसेच लोकसभा निवडणुका प्रस्तावित आहेत. सदरहू निवडणूकांच्या आचारसंहिता

कालावधी मध्ये विकास कामांना विलंब होऊ नये यास्तव मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत मंजूर असलेली विकास कामांच्या ई-निविदा प्रसिद्धीचा कालावधी खालीलप्रमाणे लागू करण्यात येत आहे.

| अ. क्र. | कामांचा प्रकार | कमीत कमी कालावधी | |
|---|---|---|---|
| | | प्रथम सुचना | द्वितीय सुचना |
| १. | रू.५.०० लाखांपेक्षा कमी किंमतीची रस्त्यांची कामे | ७ दिवस | ४ दिवस |
| २. | रू.५.०० लाख ते रू. १५.०० कोटी पर्यंतची रस्त्यांची कामे | ७ दिवस | ५ दिवस |
| ३. | रू. १५.०० कोटी अधिक किंमतीची रस्त्यांची कामे | ७ दिवस | ५ दिवस |

०२. **<u>मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत मंजूर असलेली विकास कामांच्या ई-निविदा प्रसिद्धीचा कालावधी हा दि.३१ मार्च २०२४ अखेर पर्यंत लागू राहील.</u>**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०३१३१३५५४७६५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.03.13 19:31:18 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह ) महाराष्ट्र राज्य, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री ( वित्त व नियोजन )महाराष्ट्र राज्य, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विधानसभा सदस्य, मा.विधानपरिषद, सदस्य.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, महसूल विभाग, सर्व.

९. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई *(पत्राने).
१०. मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
११. जिल्हाधिकारी,सर्व.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,सर्व.
१३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५. अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व विभाग.
१६. कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व जिल्हे.
१७. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८. मा.सचिव, (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९. मंत्रालयीन विभाग, सर्व.
२०. सह सचिव/उप सचिव सर्व, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. सर्व कार्यासने, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
२२. निवड नस्ती (कार्यासन बांधकाम-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.